**मुख्य अभियंता, (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या नियंत्रणाखालील वेगवर्धीत सिंचन लाभ कार्यक्रमांतर्गत पुणे येथिल अधीक्षक अभियंता, कुकडी प्रकल्प मंडळ, पुणे यांचे अधिपत्याखालील नियत अस्थाई आस्थापनेवरील १७ पदांना दिनांक ०१.०३.२०१५ पासून दिनांक २९.०२.२०१६ पर्यंत सेवासातत्य मंजुरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पीएलएन/२०१४/(२८३/२०१४) / निवसं-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ७ जानेवारी, २०१५.

**वाचा :**

१) **शासन निर्णय क्रमांकः जलसंपदा विभाग क्र. आढावा(२९२/२००७)/आ.(प्रशि.), दिनांक १८.११.२००८**
२) **शासन निर्णय क्रमांकः जलसंपदा विभाग क्र. आढावा(२९२/२००७)/आ.(प्रशि.), दिनांक ०१.०८.२००९**
३) **शासन निर्णय क्रमांकः जलसंपदा विभाग क्र. पीएलएन/२०१४/(९/२०१४)/ निवसं-१ दिनांक २४.०१.२०१४**
४) **अ.अ.कुकडी प्रकल्प मंडळ, पुणे यांचे पत्र क्रमांक कुप्रमं/पशा/कार्यासन-२/५१५०/ सन २०१४, दि. १२/१२/२०१४.**

**प्रस्तावना :**

शासन निर्णय दिनांक १८.११.२००८ अन्वये कार्यकारी अभियंता, वेगवर्धीत सिंचन लाभ विशेष पथक पुणे साठी महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाच्या कार्यालयातील व जलसंपदा विभागाच्या आढाव्याअंती अतिरिक्त ठरलेल्या आस्थापनेतून अंतर्गत फिरवरफिरवीने १३ पदे मंजूर करण्यात आलेली आहेत. त्याचप्रमाणे शासन निर्णय दिनांक ०१.०८.२००९ अन्वये अतिरिक्त ४ पदे उपलब्ध करुन देण्यात आली आहेत, त्यामुळे सदर पथकासाठी एकूण १७ पदे मंजूर करण्यात आली आहेत. सदर पदे विविध आस्थापनांवरुन उपलब्ध करुन दिलेली आहेत. या पदांना दिनांक २८ फेब्रुवारी, २०१५ पर्यंत शासनाच्या संदर्भिय क्र. ३, दिनांक २४/०१/२०१४ च्या शासन निर्णयान्वये सेवासातत्य मंजूरी प्रदान करण्यात आली आहे. आता संदर्भिय क्र. ४, दिनांक १२/१२/२०१४ च्या प्रस्तावानुषंगाने सदर पदांना दिनांक ०१.०३.२०१५ पासून दिनांक २९.०२.२०१६ पर्यंत सेवासातत्य मंजूरी प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मुख्य अभियंता, (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या नियंत्रणाखालील वेगवर्धीत सिंचन लाभ कार्यक्रमांतर्गत पुणे येथिल अधीक्षक अभियंता, कुकडी प्रकल्प

मंडळ, पुणे यांचे अधिपत्याखालील कार्यकारी अभियंता, वेगवर्धीत सिंचन लाभ विशेष पथक, पुणे यांच्या नियत अस्थायी आस्थापनेवरील १७ पदांना सोबतच्या विवरणपत्र क्र. १ मध्ये सदर पदांच्या समोरील स्तभं क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या कालावधीपर्यत सेवा सातत्य चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यांत येत आहे.

नियत अस्थायी आस्थापनेवरील उपरोक्त पदांवर होणारा खर्च मागणी क्र. आय-५, ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (०४) योजनेतर-वेतनावरील खर्चासाठी भाग भांडवली अंशदान, (०४) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान, (४७०१ आय १६२) या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यांत यावा.

सदर आदेश शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक असंक-१००४/प्र.क्र.१२ (भाग-२)/२००४/विसु-१/, दिनांक ०४.१०.२००४ अन्वये प्रशासकीय विभागांस प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार, आंतरवित्त सल्लागार व सहसचिव यांचे सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०७१७०३५६६८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satishkumar S Mali

Digitally signed by Satishkumar S Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Satishkumar S Mali
Date: 2015.01.08 11:36:44 +05'30'

**( सतिश माळी )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
२) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
३) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे,
४) अधीक्षक अभियंता, कुकडी प्रकल्प मंडळ, पुणे.
५) कार्यकारी अभियंता, वेगवर्धीत सिंचन लाभ विशेष पथक, पुणे
६) प्रत माहितीसाठी- मुख्य अभियंता, (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
७) कक्ष अधिकारी, मोप्र-१, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
८) प्रत : निवसं-१ (संग्रहार्थ)

**विवरणपत्र -१**

शा.नि. जलसंपदा विभाग, पीएलएन/२०१४/(२८३/२०१४) / निवसं-१

दिनांकः ७ जानेवारी ,२०१५ चे सहपत्र

कुकडी प्रकल्प मंडळ अंतर्गत वेगवर्धित सिंचन लाभ विशेष पथक, पुणे अंतर्गत नियत अस्थायी आस्थापना

| अ. क्र. | पदनाम | पदसंख्या | मुदतवाढीचा कालावधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | कार्यकारी अभियंता | १ | दि .०१/०३/२०१५ पासून दि .२९.०२.२०१६ पर्यंत |
| २ | उपविभागीय अभियंता | २ | दि .०१/०३/२०१५ पासून दि .२९.०२.२०१६ पर्यंत |
| ३ | सहा. अभियंता श्रे.२/ शाखा अभियंता | ६ | दि .०१/०३/२०१५ पासून दि .२९.०२.२०१६ पर्यंत |
| ४ | अनुरेखक | १ | दि .०१/०३/२०१५ पासून दि .२९.०२.२०१६ पर्यंत |
| ५ | लघुटंकलेखक | १ | दि .०१/०३/२०१५ पासून दि .२९.०२.२०१६ पर्यंत |
| ६ | वरिष्ठ लिपीक | १ | दि .०१/०३/२०१५ पासून दि .२९.०२.२०१६ पर्यंत |
| ७ | कनिष्ठ लिपीक (लिपिक/टंकलेखक) | १ | दि .०१/०३/२०१५ पासून दि .२९.०२.२०१६ पर्यंत |
| ८ | वाहन चालक | १ | दि .०१/०३/२०१५ पासून दि .२९.०२.२०१६ पर्यंत |
| ९ | शिपाई | ३ | दि .०१/०३/२०१५ पासून दि .२९.०२.२०१६ पर्यंत |
| | एकूण | १७ | |